आदिवासी उपयोजना जिल्हा वार्षिक योजना निधी अर्थसंकल्पित करणेबाबत सुधारीत कार्यपध्दती.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६/प्र.क्र.२४९/कार्यासन-६

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीखः ३ एप्रिल, २०१७.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः टिएसपी-२००८/प्र.क्र.०६/का.०६, दि.१६.१२.२००९

२) शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०११/प्र.क्र.३०२/का.०६, दि. ०५.१२.२०११

प्रस्तावना -

आदिवासी उपयोजना तयार करण्याची जबाबदारी दि.२१ सप्टेंबर, १९९२ च्या शासन निर्णयान्वये सन १९९३-९४ पासून आदिवासी विकास विभागावर सोपवण्यात आली आहे. त्यानुसार आदिवासी उपयोजनेचे नियोजन विषयक सर्व कामकाज, निधी उपलब्ध करुन देणे, निधी अर्थसंकल्पित करणे, वितरण करणे इ. काम आदिवासी विकास विभागाकडून हाताळण्यात येते. त्याच अनुषंगाने आदिवासी उपयोजना जिल्हा वार्षिक योजनेचा निधी अर्थसंकल्पित करणे, वितरीत करणे व या निधीतील कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबतची सुधारीत कार्यपध्दती उपरोक्त संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयानुसार निश्चित करण्यात आली आहे. तथापि विधिमंडळाच्या अंदाज समितीने दि.२२.०२.२०१७ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरून संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ " आदिवासी उपयोजनेचा निधी अर्थसंकल्पित करणे " यामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

आदिवासी उपयोजनेचा जिल्हास्तरीय निधी अर्थसंकल्पित करणे, वितरीत करणे, त्यामधील कामांना प्रशासकीय मान्यता देणे, पुनर्विनियोजन करणे इ.बाबत उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयानुसार सुधारीत कार्यपध्दतीस मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील "आदिवासी उपयोजनेचा निधी अर्थसंकल्पित करणे " या परिच्छेदामध्ये विधिमंडळाच्या अंदाजसमितीने मान्यता दिल्यानुसार खालीलप्रमाणे बदल करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) जिल्हाधिकारी हे त्या जिल्ह्याच्या आदिवासी उपयोजनेसाठी निधी वाटपासंबंधात नियंत्रक अधिकारी राहतील. संबधीत जिल्हाधिकारी हे त्यांना प्राप्त झालेल्या निधीचे कार्यान्वयीन यंत्रणेला पुनर्वाटप करण्यास सक्षम राहतील.

२) जिल्हा नियोजन समितीने मान्य केलेल्या आदिवासी उपयोजनेतील जिल्हा वार्षिक योजनेसाठीची अर्थसंकल्पिय तरतूद महसुली लेख्याखालील योजनांकरीता स्वतंत्र मागणीक्रमांक व भांडवली लेख्याखालील योजनांकरीता स्वतंत्र मागणी क्रमांक अशा एकूण दोन नवीन मागणी क्रमांकांखाली आदिवासी विकास विभागाच्या अर्थसंकल्पिय अंदाज पुस्तिकेमध्ये करण्यात येईल. प्रत्येक मागणी क्रमांकाखाली प्रत्येक जिल्हानिहाय एक स्वतंत्र लेखाशीर्ष (संगणक संकेतांक) घेण्यात येईल, व त्यानुसार प्रत्येक जिल्ह्याअंतर्गत सर्व योजनांच्या तरतूदी याअंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात येतील.

३) जिल्हानिहाय व योजनानिहाय तरतुदीची विगतवारी परिशिष्ट “ग” च्या स्वरुपामध्ये वित्त विभागामार्फत विधिमंडळास सादर करण्यात येईल.

४) जिल्हाधिकारी कार्यालयांनी संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणांच्या सहाय्याने मासिक निधी विवरणपत्र (Cash flow) तयार करावे. भांडवली खर्चाच्या बाबतीत विहीत नमुन्यात योजनानिहाय कामांची माहिती वार्षिक योजनेच्या प्रारुप आराखड्यासोबत शासनास सादर करावी. अपुर्ण कामांसाठी देय असलेला निधी वजा जाता उर्वरीत मंजूर नियतव्ययाच्या दीडपट मर्यादेत असतील अशीच बांधकामे यादीत समाविष्ट करावीत.

५) आदिवासी विकास विभागाकडून निर्गमित मार्गदर्शक सुचनांनुसार जिल्हा योजनेअंतर्गत केंद्र पुरस्कृत योजनांच्या राज्यहिश्श्याकरता प्राथम्याने पुरेशी तरतूद जिल्हा योजनेमध्ये करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी व कार्यान्वयीन यंत्रणा यांची राहील. तसेच केंद्र हिश्श्याची व राज्य हिश्श्याची तरतूद संबंधित प्रशासकीय विभागांच्या सुचनांनुसार खर्च करावी.

६) आदिवासी उपयोजनेच्या राज्य योजनांसाठीच्या तरतूदीबरोबरच जिल्हा वार्षिक योजनेची जिल्हा निहाय योजना आदिवासी विकास विभागाच्या अर्थसंकल्पिय प्रकाशनात भांडवली व महसुली लेख्याकरीता स्वतंत्र मागणी क्रमांकाखाली अर्थसंकल्पित करुन परिशिष्टासह विधीमंडळासमोर मा.मंत्री (आदिवासी विकास) यांच्याकडून सादर केल्या जातील. जिल्हा योजनांमध्ये समाविष्ट रकमेच्या मागण्यांवरील चर्चेमध्ये सहभागी होणे व उत्तर देणे व तत्सम विधीमंडळ कार्यनियमावली अंतर्गत इतर कार्यवाही, संबंधीत विषयाचे मा.मंत्री यांच्याकडून करण्यात येईल.

७) विधीमंडळाने अर्थसंकल्पिय तरतूदीस मान्यता दिल्यानंतर संबंधीत जिल्ह्यांसाठी असलेल्या एकूण तरतूदीचे वितरण आदिवासी विकास विभागाकडून संबंधित जिल्हाधिकारी यांना विहीत कार्यपध्दतीनुसार करण्यात येईल.

८) जिल्हाधिकारी यांनी आदिवासी विकास विभागाकडून निधी प्राप्त झाल्यापासून जास्तीत जास्त एक महिन्याचे आत कार्यान्वयीन यंत्रणांना निधीचे वाटप करणे आवश्यक राहील. एखाद्या जिल्हाधिकाऱ्यांनी सदरची जबाबदारी वेळीच पार पाडली नाही तर संबंधीत विभागीय आयुक्त यांनी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडून निधी वाटपाचे काम पूर्ण करुन घेणे अनिवार्य राहील.

९) आर्थिक वर्षामध्ये करण्यात आलेले पुनर्विनियोजन/ पुनर्वितरणाबाबत योजनानिहाय सविस्तर माहिती आर्थिक वर्ष संपताच शासनास सादर करावी जेणेकरून " अंतिम सुधारीत तरतूद ( FMG )" निश्चित करणे शक्य होईल.

यासंदर्भात BEAMS प्रणालीमध्ये आवश्यक त्या सुधारणा वित्त विभाग व NIC (National Informatics Centre) च्या सल्ल्याने करण्यात येतील.

उपरोक्त प्रमाणे कार्यवाही करण्यात येत असल्याने संदर्भाधीन क्र.२ येथील पूनर्विनियोजनाबाबतच्या शासन निर्णयामधील " जिल्हा वार्षीक आदिवासी उपयोजना पुनर्विनियोजन प्रस्ताव " अंतर्गत तरतूदी रद्द करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र विधानमंडळाच्या अंदाज समितीच्या दि.२२.०२.२०१७ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०३१०५७२०३५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: CN = Bhagwan Maruti Sawant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Tribal Development
Date: 2017.04.03 13:16:28 +05'30'

**भगवान सावंत**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा.मंत्री(आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री(आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
५. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक

६. सर्व अपर मुख्य सचिव, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,
७. मा.प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
८. मा.प्रधान सचिव (नियोजन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
९. सर्व प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग.
१०.विभागीय आयुक्त (सर्व).
११.आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१२.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१३.व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक
१४.व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक
१५.अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
१६.महालेखापाल (लेखापरिक्षा)(लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र १-२ मुंबई/नागपूर (प्रत्येकी ५ प्रती).
१७.सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास समिती.
१८ सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१९.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२०.उपसंचालक, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र पडताळणी समिती, ठाणे/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर/नंदूरबार/गडचिरोली.
२१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२३.संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मुंबई
२४.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई
२५.सर्व सहसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२६.निवडनस्ती(कार्या-६).